**RIDF नाबार्ड अंतर्गत मेगा पाणलोट विकास कार्यक्रम**
WDT सदस्यांच्या नेमणुकीबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक नाबार्ड-२०१०/प्र.क्र.१८८/जल-७,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ मार्च,२०११.

वाचा :- १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.नाबार्ड-२००९/प्र.क्र.४९/जल-७, दिनांक २९/१०/२००९
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र..नाबार्ड-२०१०/प्र.क्र.९१/जल-७, दिनांक ३/६/२०१०.
३) नाबार्डचे पत्र क्र.एनबी/एमआरओ/एसपीडी/आरआयडीएफ-१६/११३ पीएससी/१०-११, दिनांक २४/११/२०१०.
४) संचालक (मृदसंधारण) यांचे पत्र क्र.मृदसं/आरआयडीएफ/डीपीआर/मृद-२/३३६६/२०१०, दिनांक ४/१२/२०१०.
५) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.नाबार्ड-२००९/प्र.क्र.९१/जल-७, दिनांक १८/१/२०११.
६) नाबार्डचे पत्र क्र.एनबी/एमआरओ/एसपीडी/आरआयडीएफ-१६/११४/पीएससी/१०-११, दिनांक ८/२/२०११

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्यातील पडीक तसेच अवनत जमिनीचा विकास करण्यासाठी शासनाने पाणलोट विकास कार्यक्रमावर भर दिलेला आहे. राज्यातील जलसंधारण कार्यक्रमाच्या नियोजनाची, प्रकल्प अंमलबजावणीची पुर्नरचना करुन पाणलोट विकासाचा कार्यक्रम सन १९९६ पासून एकात्मिक पाणलोट विकास कार्यक्रम म्हणून राबविण्यात येत आहे. याशिवाय राज्यात पाणलोट विकासाच्या विविध राज्य व केंद्र पुरस्कृत योजनांची अंमलबजावणी देखील करण्यात येत आहे.

राज्यातील पाणलोट विकास कार्यक्रमांतर्गत सध्याच्या भूजलाची स्थिती तसेच भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा (GSDA) आणि महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर (MRSAC) यांच्या अहवालानुसार एकूण GSDA च्या १५०५ पाणलोटांपैकी ७९३ पाणलोट हे उच्च (High), मध्यम (Moderat), कमी (Low) व अत्यंत कमी (Least) प्राथमिकता असलेले पाणलोट आहेत. सदर मेगा पाणलोटांपैकी एकूण ६८ मेगा पाणलोट (२६० Clusters) सन २००९-१० पासून विकसित करण्यास निवडण्यात आले आहेत. याकरिता नाबार्डच्या सहकार्याने आयुक्त (कृषि) यांनी मार्गदर्शक सूचना तयार केल्या आहेत. या मार्गदर्शक सूचनांनुसार तालुका स्तरावर प्रकल्प कार्यान्वयीन यंत्रणा कार्यान्वीत आहे. या प्रत्येक प्रकल्प कार्यान्वयीन यंत्रणेंतर्गत पकल्पनिहाय पाणलोट विकास पथके (WDT) नियुक्त करावयाची आहेत. त्यामध्ये (१)कृषि/वन विषयातील सदस्य (प्रकल्प कार्यान्वयीन यंत्रणेचा कर्मचारी), (२) कृषि/वन विषयातील सदस्य (कंत्राटीपध्दत), (३) समाज कार्यकर्ता (कंत्राटीपध्दत),

(४) संस्थात्मक बांधणी सदस्य (कंत्राटीपध्दत) समाविष्ट आहेत. संचालक, मृदसंधारण यांच्या प्रस्तावानुसार, सदस्य क्र.२, ३ व ४ यांची नेमणूक सेवा पुरवठादार संस्थेकडून करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१०-११ या वर्षाकरीता नाबार्डने आतापर्यंत नागपूर जिल्ह्यातील WRWB-२ या मेगापाणलोटातील ४ प्रकल्प व अकोला जिल्ह्यातील PTM-२ या मेगापाणलोटातील २ प्रकल्प असे एकूण ६ प्रकल्पांना संदर्भाधीन दि.२४/११/२०१० च्या पत्रान्वये आणि सोलापूर जिल्ह्यातील BM-१३२ व BM-१३३ या मेगा पाणलोटातील ६ प्रकल्पांना संदर्भाधीन दि.८/२/२०११ च्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पामधील पाणलोट विकास पथकातील (WDT) सदस्य क्र.२, ३ च्या नेमणूका महाराष्ट्र उद्योजकता विकास केंद्र (MCED) या सेवा पुरवठादार संस्थेकडून व सदस्य क्र.४ ची नेमणूक कर्वे समाजसेवा संस्था कर्वेनगर, पुणे यांच्यामार्फत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरच्या नेमणुका या निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात असतील. तसेच पुढे उद्‌भवणाऱ्या अडचणींची जबाबदारी संबंधीत संस्थेची राहील, ही अट व आवश्यक त्या इतर अटींसह संबंधीत संस्थेसोबत आयुक्त (कृषि) यांनी करारपत्र (Memorandum of Understanding) करावे.

३. सदस्यांच्या मानधनाकरिता लागणारा निधी त्या प्रकल्पाच्या किंमतीमध्ये अंतर्भूत असल्याने त्याकरिता स्वतंत्र निधी दिला जाणार नाही. सदस्यांचे मानधन IWMP च्या धर्तीवर अदा करावे.

४. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०३०३१८४९३३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( ना. श्री. कराड )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री,(जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद.
मुख्य सचिव यांचे सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग

..३/

विभागीय आयुक्त, नागपूर/अमरावती,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे
महाव्यवस्थापक, नाबार्ड, पुणे.
सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, पुणे
मुख्य अभियंता,लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
जिल्हाधिकारी, नागपूर/अकोला,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,/ प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, नागपूर/अकोला
विभागीय कृषि सहसंचालक, नागपूर/अमरावती,
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, नागपूर/ अकोला,
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/अकोला,
सचिव, कर्वे समाजसेवा संस्था, १८, हिलसाईड, कर्वेनगर, पुणे-५२,
प्रशासकीय अधिकारी, MCED, ए-३८, एमआयडीसी, पो.बॉ.क्र.५४६,
रेल्वे स्टेशनजवळ, औरंगाबाद-४३१ ००५.
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व सहसचिव /उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती-जल-७ .